**मागासवर्गीय गृहनिर्माण योजनेअंतर्गत (PWR-२१९) गृहनिर्माण संस्थांच्या पुनर्विकासाच्या धोरणांबाबत शिफारस करण्यासाठी समितीची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२५/ अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ११ सप्टेंबर, २०२०.

**संदर्भ :** सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक बीसीएच-२००८/ प्र.क्र.१८७/मावक-२, दिनांक २६ जून, २००९.

**प्रस्तावना :**

मागासवर्गीय गृहनिर्माण योजनेसंदर्भात (PWR-२१९) मा.मंत्री (सामाजिक न्याय) महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०९ सप्टेंबर,२०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये सदर गृहनिर्माण संस्थांच्या पुनर्विकासाच्या धोरणाबाबत शिफारस करण्यासाठी समितीची स्थापना करण्याबाबत, मा. मंत्री महोदयांनी निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मागासवर्गीय गृहनिर्माण योजनेअंतर्गत (PWR-२१९) सदर गृहनिर्माण संस्थांच्या पुनर्विकासाच्या धोरणासंदर्भात शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | आयुक्त, समाज कल्याण, पुणे | अध्यक्ष |
| २. | जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर | सदस्य |
| ३. | जिल्हाधिकारी, पुणे | सदस्य |
| ४. | सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ५. | सह सचिव/उप सचिव, महसूल विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ६. | सह सचिव/उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ७. | अवर सचिव (अजाक), सा.न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय | सदस्य सचिव |

**२.** महाराष्ट्रात या योजनेंतर्गत मंजूर केलेल्या मागासवर्गीय गृहनिर्माण संस्थांच्या पुनर्विकासाच्या संदर्भात, पुनर्विकासासाठी संस्थांना वाढीव चटई क्षेत्र (एफ.एस.आय.) किंवा हस्तांतरणीय विकास अधिकार (टी.डी.आर.)नुसार प्राप्त होणारे वाढीव क्षेत्रफळ व त्यानुसार विक्रीसाठी प्राप्त होणाऱ्या अतिरीक्त सदनिका/गाळे इत्यादीबाबत मागासवर्गीय व अमागासवर्गीय सभासदांबाबतचे प्रमाण ठरविणे या व इतर अनुषंगिक बाबींबाबत सदर समिती शिफारस करेल.

**३.** त्याचप्रमाणे पुनर्विकासाबाबत धोरणांचा अभ्यास करुन मागासवर्गीय गृहनिर्माण संस्थांच्या पुनर्विकासासंदर्भात सर्व समावेशक धोरणासंबंधी समितीने आपल्या शिफारशींचा अहवाल शासनास १५ दिवसांत सादर करावा.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९१११६४३१०३१२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINGLE DINESH RAMCHANDRA

Digitally signed by DINGLE DINESH RAMCHANDRA
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, postalCode=400032, street=151 ANNEX,1ST FLOOR,MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=fc344849650ce07c3f9adc7e2cd4976b2852065e2acd65f7cee1828c10091458, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DINGLE DINESH RAMCHANDRA
Date: 2020.09.11 16:43:39 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा. अ.मु.स. (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. मा. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर/ पुणे,
५. संचालक, नगर रचना संचालनालय, मुंबई,
६. सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. अवर सचिव (अजाक), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, मुंबई,
९. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, मुंबई उपनगर,
१०. मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. मा. राज्य मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. मा. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१३. निवडनस्ती (अजाक).